राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरणाची अंमलबजावणी करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण - २०१८ / प्र. क्र. १३९ /१८ (र.व का.)**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक : २९ ऑगस्ट, २०१८.

वाचा : १) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक : ज्येष्ठना २०१६ / प्र. क्र. ७१ / सामासू, दिनांक ९ जुलै, २०१८.

**परिपत्रक :**

ज्येष्ठ नागरिक सुस्थितीत असण्याच्या दृष्टीने सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या दिनांक ९ जुलै, २०१८ च्या शासन निर्णयान्वये, राज्याचे सर्वसमावेशक ज्येष्ठ नागरिक धोरण २०१३ ची अंमलबजावणी करण्यासंदर्भात सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर धोरणाच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग तसेच शासकीय /निमशासकीय कार्यालयांनी त्यांचे कार्यालयात प्राप्त होणाऱ्या ज्येष्ठ नागरिकांच्या समस्यांचा प्राधान्याने निपटारा होईल, याची दक्षता घ्यावी.

२) शासकीय / निमशासकीय संस्था / कार्यालये, समाज मंदिरे, विरंगुळा केंद्रे येथील जागा ठराविक दिवशी ठराविक वेळेमध्ये ज्येष्ठ नागरिकांच्या कार्यक्रमाकरिता उपलब्ध करून देण्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाने उचित कार्यवाही करावी.

३) ज्येष्ठ नागरिकांच्या प्रश्नांची आस्थापूर्वक सोडवणूक होण्यासाठी व विविध विभागामार्फत राबवावयाच्या योजनांचे संनियंत्रण व्हावे, याकरिता सामाजिक न्याय व सर्व शासकीय विभाग यांमध्ये समन्वय साधण्यासाठी प्रत्येक मंत्रालयीन प्रशासकीय विभागांमध्ये एक सह / उपसचिव यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात यावी. याबाबतची माहिती सर्व मंत्रालयीन विभागांनी सामाजिक न्याय विभागास उपलब्ध करून द्यावी. तसेच सामाजिक न्याय विभागाने यासंदर्भातील संकलित माहिती विभागाच्या संकेतस्थळावर प्रसिद्ध करावी.

२. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक **२०१८०८२९१७३९४८९७०७** असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Samridhi V. Angolkar
Date: 2018.08.29 17:44:20 +05'30'

**( समृद्धी अनगोळकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई,

२.सर्व सन्माननीय विधानसभा, विधानपरिषद व संसद सदस्य,
३.मा. राज्यपालांचे सचिव (५ प्रती),
४.मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव (५ प्रती),
५.मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव (५ प्रती),
६.मा. सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / स्वीय सहायक,
७.मा.मुख्य सचिवांचे कार्यालय,
८.मा.महाअधिवक्ता,महाराष्ट्र राज्य
९.सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
१०.प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई (५ प्रती),
११.प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
१२.प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
१३.प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय (२ प्रती),
१४.सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१५.सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
१६.मुख्य माहिती आयुक्त,महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१७. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१८.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,
१९.सर्व मंत्रालयीन विभाग
२०.सर्व विभागीय आयुक्त,
२१.सर्व जिल्हाधिकारी,
२२.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२३.मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
२४.सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
२५.निवड नस्ती.(कार्यासन-१८)